महाराष्ट्र-कर्नाटक सीमावर्ती भागातील विद्यार्थ्यांकरिता शैक्षणिक उपक्रम राबविण्यासंदर्भात अभ्यास समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१५०/विशि-३,**

मंत्रालय, विस्तार भवन, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मुंबई ४०० ०३२,

दिनांक: ०१ जुलै, २०२०.

प्रस्तावनाः-

महाराष्ट्र-कर्नाटक सीमा भागातील लोकसंख्या, विद्यार्थीसंख्या, महाविद्यालयांची संख्या व राबवावयाचे शैक्षणिक उपक्रम यासंदर्भात मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० रोजी शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथे आयोजित बैठकीत विचारविनिमय करण्यात आला. यावेळी सीमा भागातील विद्यार्थ्यांवर अन्याय होऊ नये म्हणून एक स्वतंत्र मराठी भाषिक महाविद्यालय चालू करण्यासाठी योग्य तो प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत तसेच या महाविद्यालयास लागणारी ५ एकर जमीन हलकर्णी, ता.चंदगड किंवा ता.गडहिंग्लज येथील शासकीय जमीन उपलब्ध करुन देण्याबाबत विचारविनिमय झाला.

याप्रकरणी दिनांक ३० जून, २०२० रोजी मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली आढावा बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये यासंदर्भात अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी अभ्यास समिती गठित करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कोल्हापूर जिल्ह्यातील सीमावर्ती भागामध्ये शासकीय मराठी महाविद्यालय/ शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांचे उपकेंद्र स्थापन करण्यासंदर्भात उपाययोजना सुचविण्याकरीता खालीलप्रमाणे अभ्यास समितीची स्थापना करण्यात येत आहेः-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | डॉ. करमळकर, कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | अध्यक्ष |
| २. | संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे | सदस्य |
| ३. | जिल्हाधिकारी, कोल्हापूर | सदस्य |
| ४. | पोलीस अधिक्षक, कोल्हापूर | सदस्य |
| ५. | प्रा. डॉ. दिपक पवार, राज्यशास्त्र विभाग, मुंबई विद्यापीठ, कालिना, सांताक्रूझ (पू), मुंबई | सदस्य |
| ६. | कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | सदस्य-सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

(१) कोल्हापूर जिल्ह्यातील सीमावर्ती भागातील मराठी भाषिक विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र शासकीय महाविद्यालय स्थापन करण्याच्यादृष्टीने जागेची उपलब्धता, पदनिर्मिती, पायाभूत सुविधा, निधीची आवश्यकता, या घटकांची निश्चिती करणे.

(२) मराठी भाषिक विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र शासकीय महाविद्यालय स्थापन करण्याच्या प्रक्रियेस काही कालावधी लागण्याची शक्यता विचारात घेऊन कोल्हापूर जिल्ह्यातील चंदगड अथवा गडहिंग्लज तालुक्यामध्ये अथवा कोल्हापूर शहरामध्ये उपलब्ध असलेल्या शासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्थांच्या/ शैक्षणिक संस्थांच्या/ विद्यापीठाच्या इमारतीमध्ये अथवा राजाराम शासकीय महाविद्यालय, कोल्हापूर येथे तात्पुरत्या स्वरुपात उपकेंद्र कार्यान्वित करता येऊ शकेल किंवा कसे याबाबत शिफारस करणे.

(३) प्रस्तावित उपकेंद्रामध्ये शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून किमान उपलब्ध मनुष्यबळाच्या आधारे मराठी भाषिक विद्यार्थ्यांसाठी काही निवडक अभ्यासक्रम ऑनलाईन स्वरुपात सुरु करता येतील किंवा कसे तसेच अभ्यासक्रमाचे स्वरुप काय राहिल याकरिता शिफारस करणे.

सदर समितीने आपल्या शिफारशींसह सविस्तर अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७०११३१२४७४८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, cn=Satish Jagdeorao Tidke
Date: 2020.07.01 13:17:30 +05'30'

**( सतिश तिडके )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रतः-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

५. मा.कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर

६. जिल्हाधिकारी, कोल्हापूर

७. पोलीस अधिक्षक, कोल्हापूर

८. उप सचिव यांचे स्वीय सहाय्यक, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.

९. संचालक, उच्च शिक्षण, पुणे

१०. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर

११. प्रा.डॉ. दिपक पवार, राज्यशास्त्र विभाग, मुंबई विद्यापीठ, कालिना, सांताक्रूझ (पू), मुंबई

१२. निवडनस्ती (विशि-३).